**Vol. 6** | 1st August, 2019 (Monthly)
**Price**: ₹100/- | **Total Pages**: 36

# चिकूPiku.com

## Fun & Learning

For Kids & Parents

1 to 8 Years

Brain-based Nurturing for Early Childhood.
Stories & Activities in मराठी & English Languages.

# रोज एक गोष्ट ऐकायला हवी,
# गोष्टींची जादू जगायला हवी!



१ ते ८ वयोगटातील मुले व
त्यांच्या पालकांसाठी मासिक

**चिकूपिकू – दोन भाषांत का?**
'मेंदूमध्ये अनेक भाषा शिकण्याच्या यंत्रणा आहेत. मूल अनेक भाषा शिकू शकतं.' असं भाषातज्ज्ञ नोम चोम्स्की यांचं संशोधन सांगतं. सहजपणे, अगदी नैसर्गिक वातावरणात ज्या भाषा कानावर पडतील त्या मुलांना येतात. मातृभाषा ही त्याची पहिली भाषा असते. १ ते ८ वयोगटातील मुलं मातृभाषेत विचार करून, त्यांच्या भावना चांगल्या प्रकारे व्यक्त करू शकतात. आज मुलांना इंग्रजी शिकणंसुद्धा अपरिहार्य झालं आहे. म्हणून हा अंक मराठी आणि इंग्रजी अशा दोन्ही भाषांमध्ये आहे.

**मराठीतून गोष्टी कशासाठी?**
१ ते ८ या वयोगटातल्या मुलांचा भाषाविकास फार जोमाने होत असतो. बाळ जन्मापासून आईची भाषा ऐकत असतं. घरातील, परिसरातील भाषा ऐकत असतं. या भाषेशी त्याची विशेष जवळीक (connect) असते. मूल इंग्रजी माध्यमाच्या शाळेत जात असले तरी मातृभाषेत सांगितलेल्या गोष्टींमुळे भावनिक विकास साधला जातो. हे लक्षात घेऊन अंकातल्या बहुतेक गोष्टी मराठी भाषेत आहेत. यातून त्यांना नवे शब्द माहीत होतात.

**चिकूपिकू आणि Multiple Intelligence**
डॉ. हॉवर्ड गार्डनर यांच्या Theory of Multiple Intelligences या जगप्रसिद्ध सिद्धांतातील तत्वं पानोपानी दिसतील. पालक किंवा शिक्षकांनी या activities करून घेतल्या तर मुलांमधील आठ बुद्धिमत्तांपैकी प्राधान्य बुद्धिमत्तांचा शोध पालकांना नक्कीच लागेल.




ChikuPiku team of experts: **Dr. Shruti Panse** (Educationist) | **Abha Bhagwat** (Artist- Wall art painting)
**Dharmaraj Patil** (Ornithologist) | **Vaidehi Ashtaputre-Kulkarni** (Storyteller)
**Vaishali Karlekar** (Author) | (An enthusiastic team of illustrators & artists)

**Owned & Published by** OneZeroEight Learning Pvt. Ltd. | **Editor**: Dr. Shruti Panse
**Printed by** Atharva Print Creation, S. No. 91/1, Plot No. 8, Tulshibaugwale Colony, Sahakar Nagar, Pune 411 009
**Published at** Flat No. 10, Narayan Complex, 2nd Floor, Hingne Kh., Sinhgad Road, Pune 411 051

# प्रिय आई-बाबा,

एक लहानसं मूल सगळ्यांच्या आयुष्यात एक वेगळीच मजा आणतं. घराला अक्षरशः गरागरा फिरवत असतं. सगळी मोठी माणसं त्या छोट्याच्या तालावर नाचायला आनंदाने तयार असतात. आपल्या सर्वांचेच लाडके कवी गुलजार यांनी बालपणाबद्दल फार छान लिहिलं आहे. त्यांचा नातू 'समय' दोन वर्षांचा होता तेव्हा त्यांनी लिहिलेली ही कविता...



छोटासा 'प्लॅनेट' समझा था,
पैदा हुवा है मेरे 'सोलर सिस्टिम' में!
मेरा नवासा मेरा समय...
दो ही साल का है और यूं महसूस होता है
सूरज वो है और हम सब-
उसके 'प्लॅनेट' है
उसके गिर्द घुमा करते है
मोह में कैसी 'ग्रॅव्हिटी' जैसी ताकत होती है



- गुलज़ार

अशा या लहानग्यांसाठी घरातली मोठी माणसं काहीही करायला तयार असतात. हेच वय असतं, मुलांवर भरभरून प्रेम करण्याचं. त्यांच्या चांगल्या शरीर बांधणीसाठी छान खाऊ-पिऊ घालण्याचं. त्यांच्या मानसिक आणि बौद्धिक विकासासाठी खतपाणी घालण्याचं.



आपण मुलांना आज ज्या गोष्टी सांगतो, करतो, आपल्या सहज वागण्या-बोलण्यातून मुलं शिकत असतात. स्वतःच्या कल्पना आणि विचारांची बांधणी करत असतात.

आपण आणि आपली मुलं यांच्यात असलेली ही गोड आणि हवीहवीशी ग्रॅव्हिटी कायमच जपायची आहे!

डॉ. श्रुती पानसे
Editor - ChikuPiku
Ph.D. (Brain-Based Learning)
Educationist | Consultant | Child Psychologist
www.shrutipanse.com

# फिशिरा

## अनोळखी प्राणी

फिशिरा आणि तिचे मित्र-मैत्रिणी गप्पा मारत असतात. त्याच वेळेला तिथे एक लालसर रंगाचा प्राणी अलगद तरंगत-तरंगत येतो आणि एका दगडावर थांबतो.

ए, ते बघ काय आलंय? हा कुठला नवीन प्राणी?

अरे, हा तर आपल्यातच येऊन बसला. त्याची हालचाल पण काहीतरी वेगळीच वाटतेय ना?

होSSS हा पोहत पण नाहीये. नुसता तरंगतोय पाण्यावर इकडून तिकडे. असं वाटतंय की पाणी ढकलतंय त्याला. त्याचा रंग किती मस्त आहे ना.


Audio story available on www.chikupiku.com/audio

तितक्यात फिशिराची आई तिकडे येते.

आई, हे बघ ना काय आहे!
हा प्राणी बघ नं, नुसताच तरंगतोय इकडे-तिकडे!

अरे हा प्राणी नाहीये.
हा माणसांनी तयार केलेला प्लॅस्टिकचा तुकडा आहे.

मला तर त्याला खावसं वाटतंय!

हा खायचा नसतो. पूर्वी आपल्यातल्या एका माशाने खाल्ला आणि तो मरूनच गेला.


Naturalistic / Linguistic Intelligence

Can you spot purple fish in the picture?
How many fish are there? Answer:

प्लॅस्टिक?
प्लॅस्टिक म्हणजे काय?



ते आपल्यासाठी खूप घातक असतं,
हा तुकडा छोटासा आणि छान दिसत असला
तरीसुद्धा आपल्या पोटात अडकून बसतो
आणि नंतर आपल्याला श्वास घेता येत नाही.





पण का सोडतात अशी
भयानक गोष्ट आपल्या
पाण्यात?

कोण जाणे का सोडतात ते!
पण आपण त्याच्या वाट्याला
मुळीच जायचं नाही.
लांब राहायचं त्याच्यापासून!



लेखन: डॉ. श्रुती पानसे

**Parents Zone**

आपल्या आजूबाजूचा परिसर, आपली नदी स्वच्छ ठेवणं ही आपली जबाबदारी आहे. हे मुलांना समजावून सांगा. फिशिराच्या गोष्टीचं उदाहरण देऊन आपण केलेल्या कचऱ्याचा इतर प्राण्यांना कसा त्रास होतो हे ही आपण सांगू शकतो.

फिशिरा, मिलू आणि ऑक्टीने वेगवेगळ्या रंगाचे तारा मासे पकडले आहेत. कोणी कुठल्या रंगाचा मासा पकडलाय ते शोध आणि तसेच रंग भर.














Logical Intelligence

# पेम्बा

पेम्बा नावाचा एक लहानसा मुलगा आहे. तो पहाडात म्हणजे डोंगरात राहतो.

त्याच्या घराच्या आसपास भरपूर झाडं आणि झुडपं आहेत. पिकं आहेत. तिथे मोकळ्या जागेत तो रोज संध्याकाळी खेळतो.

एकदा काय झालं, मित्र–मैत्रिणींशी खेळून झाल्यावर तो एकटाच शेतामध्ये रिंग खेळत होता. खेळता–खेळता त्याची रिंग खूप उंच गेली आणि चक्क आकाशात दिसेनाशी झाली.

**आंऽऽऽ माझी रिंग ?**
**माझी रिंग कुठे गेली ? ?**

पेम्बाला काहीच कळेना!
त्याने रिंग खूप शोधली ...शोधली... शोधली....!







एवढ्यात संध्याकाळ संपून रात्र सुरू झाली होती. अंधुक दिसणारा चंद्र आता चंदेरी चमकत होता. पेम्बाने जोरात चंद्राला हाक मारली आणि विचारलं,

**ए, तू घेतलीस का माझी रिंग? घेतली असेल तर परत कर. माझी रिंग घेतलेली मला अजिबात चालणार नाही. आत्ताच्या आत्ता माझी रिंग परत कर नाहीतर मी तुला शिक्षा करीन.**



यावर चंद्र काहीच बोलला नाही.

एवढ्यात आईने हाक मारली. पेम्बा, घरी चल. आता साप-विंचू निघतील रात्रीचे.

हे ऐकून पेम्बा घरी आला.

रात्र संपली. सकाळ उगवली. सकाळी गडबडीमध्ये तो शाळेत निघून गेला.

दुपारी घरी आला. मग त्याने शहाण्या मुलासारखा थोडासा अभ्यास केला. थोडावेळ झोपला.



Audio story available on www.chikupiku.com/audio



पुन्हा संध्याकाळ झाली. पेम्बा खेळायला मित्र–मैत्रिणींबरोबर निघून गेला. सगळे मित्र खूप खूप खेळले. रात्र होत आली तसे सगळे मित्र आपापल्या घरी निघून गेले.

समोर चकाकणारा चंद्र दिसायला लागला. तेवढ्यात त्याला आठवलं... काल आपली आवडती रिंग आकाशात दिसेनाशी झाली होती. ती रिंग चंद्राने घेतली आणि परत दिलीच नाही. असं कसं ?

त्याने जोरात चंद्राला खडसावलं.

**माझी रिंग देतोस की नाही ? का सांगू तुझं नाव आईला ?**

असं म्हणून तो घराकडे जायला निघाला.

.... तर काय! अननसाच्या दाट आणि मोठ्या पानांमध्ये त्याला त्याची लाल रंगाची रिंग पटकन दिसली. रिंग बघून पेम्बा खूप खूष झाला.

आणि चंद्राकडे बघून म्हणाला, ..........................................................................................

..........................................................................................................................

**(पेम्बा चंद्राला काय बरं म्हणाला असेल ? हे तुम्हीच शोधून काढा आणि दिलेल्या जागेत लिहा.)**



लेखन: डॉ. श्रुती पानसे

**Parents Zone**

मुलं गोष्टीचा शेवट creative करु शकतात. त्यांना सूचना न देता व्यक्त होऊ द्या.





बघ
आणि
बनव

डाळी, कडधान्यं आणि साबुदाण्यांपासून बनवलेला भारताचा झेंडा बघ. हा बनवण्यासाठी मसूर डाळ, साबूदाणा, मूग आणि राजमा वापरला आहे. तू पण असा झेंडा करुन बघ बरं! (अशोकचक्रासाठी साबुदाण्यांना शाईत बुडवून निळे केले आहे.)



Hand-eye Co-ordination




एकदा पिकू तिच्या मित्र-मैत्रिणींबरोबर गप्पा मारत असते. त्यांचा गडबड-गोंधळ ऐकून चिकू तिथे येतो.

पिकूSSS पिकू, अगं किती ओरडताय तुम्ही सगळेजण, काय करताय सगळे मिळून? पिकू, तुझं लक्ष आहे का?

तुम्ही सर्वजण मिळून किती दंगा करताय. नुसती चिव-चिव ऐकू येतेय मगाचपासून.

Naturalistic / Verbal Intelligence

चिकू, आम्ही सगळे जमून एकमेकांशी
गप्पा मारतोय, की कुठे दाणे मिळतात?
कुठे पाणी मिळतं? कुठे छान घरटं बांधता येतं?.




**मग पिकूचे सगळे मित्र-मैत्रिणी चिकूला त्यांच्या गमती-जमती सांगायला लागतात.**



मी पोपटदादा. मी नदीपलीकडच्या जंगलात राहतो. आमच्या इथे भरपूर फळांची झाडं आहेत. त्यातल्या एका झाडाच्या ढोलीत मी राहतो. तिथल्या झाडांवरचे पेरू खूप मोठे आणि गोड-गोड आहेत.

चिकू, तू जसं जिभेनं अंग स्वच्छ करतोस ना. तसं आम्ही चिमण्या चिखलात अंघोळ करतो. म्हणजे चिखल अंगाला लावून घेतो आणि मग अंग झटकून टाकतो. त्यामुळे आमच्या पंखामध्ये लपलेले किडे, चिखलाबरोबर बाहेर पडतात.





मी कबुतरदादा. आम्हाला भरपूर दाणे कुठे मिळतात माहितेय? काकू, मावश्या उन्हात वाळवण घालतात. त्यांचं लक्ष नसताना हळूच जाऊन आम्ही दाणे वेचतो.



Audio story available on www.chikupiku.com/audio

माझं गाणं सगळ्यांना आवडतं,
म्हणून मी रोज या कावळेदादाला
गाणं शिकवायला येतोय.
माहितेय का मी कोण?



अगं पिकू, म्हणजे ही
तुमची शाळा आहे का?

शाळा?
शाळा म्हणजे काय?















अगं, मिकू नाही का जात शाळेत गंमत-जंमत करायला,
गाणी म्हणायला, गोष्टी ऐकायला आणि खेळायला. तसंच आहे हे.



हो ना, अगदी खरं
ही धमालशाळाच
आहे आमची.

पण तू कुठे निघालास?

माझ्या शाळेत!!



**लेखन: वैशाली कार्लेकर**

पिकूला तिच्या घरट्यापर्यंत पोहचण्यास मदत कर बरं.
तिथे पोहोचण्यासाठी दिलेल्या फळांच्या रंगाप्रमाणे ती फळं रंगव.



Visual / Spatial / Logical Intelligence





Audio story available on www.chikupiku.com/audio

माऊला तोंडात बोटं घालून नखं खायची सवय होती. आई-बाबा सारखं तिला सांगायचे, माऊ नखं खाऊ नकोस. तरीही कोणाचं लक्ष नसताना माऊ नखं खायची. असंच एकदा माऊ नखं खात असताना साहिल तिथे येतो.














Logical & Interpersonal Intelligence / Awareness of Hygiene








## मुलांसोबत ही Activity करून पहा!

-आभा भागवत


Visual / Spatial Intelligence

साहित्य - कुठलाही जाडसर रंगीत कागद (पांढरा कागद असेल तर मुलाने हवा त्या रंगाने रंगवून घ्यावा किंवा जाड कागद विकत आणावा), आवडत्या रंगांचे खडू पांढऱ्या कागदावर रंगवायला, डिंक.



1. मोठा रंगीत कागद घे.



2. तो कागद मधोमध दुमडून घे.



3. त्याच्या एका भागावर फुलपाखराचा एक पंख आणि अर्धं अंग काढ.



4. फुलपाखराचा आकार काप. दोन्ही बाजूला सारखे पंख असणारं फुलपाखरू झालं का?



5. आता इतर रंगीत कागदांचे छोटे आकार काप.



6. फुलपाखराचे पंख हवे तसे सजव.

तुम्ही तयार केलेलं फुलपाखरू आम्हाला Whatsapp वर पाठवा. 91721 36478



## पालकांसाठी

हे चित्र म्हणजे रेषेच्या दोन्ही बाजूला सारखं तयार करण्याची एक छोटीशी युक्ती नव्हे तर जादूच आपण छोट्या मुलांना दाखवत आहोत. मुलाच्या वयाप्रमाणे त्याला / तिला कमी अधिक मदत लागेल. मुलांनी कापलेल्या आकाराचंच चित्र ठेवावं, ते मोठ्यांनी फार करू नये. फुलपाखराच्या पंखांवर नक्षी चिकटवताना दोन कागद एकदम कापावेत म्हणजे सारखे दोन आकार मिळतील. ही जादू बघताना मुलांना मजा येते. काही वेळा जास्तच कापलं जाऊन कागदाचे दोन तुकडे होऊ शकतात, अशा वेळी पुन्हा दुसरा कागद द्या किंवा तुटलेले कागद चिकटवून आकार कसा करता येईल बघा.



### आवर्जून काय कराल?

मुलाने कापलेला आकार कितीही प्रमाणाबाहेर असला किंवा वेडा-वाकडा असला तरी तो त्याला / तिला स्वतःला जमणारा आहे, त्यामुळे तो तसाच ठेवा. त्याचं कौतुक करा.







### काय करू नका?

मुलांच्या प्रयोगांना, वेडं-वाकडं कापण्याला थांबवू नका. मुलांच्या प्रयत्नांना हसू नका.

Baba, the clock is square in shape just like this biscuit

That s right Chinu. In this room, can you see other objects that are square in shape?

## Can you find square shapes in this picture?

# Trace the square shaped robot & colour it.



हे चित्र आम्हाला
Whatsapp वर पाठवा.
91721 36478




## छोट्या छबीची चंद्रावर स्वारी

एकदा रात्री छबी आणि आजी घराबाहेरच्या बाकावर बसल्या होत्या.

छबी म्हणाली, ''**आजी, चांदोबा बघ किती छान दिसतोय. तो माझ्याकडे बघून हसतोय का गं? आजी मला चांदोबाला भेटायचंय. त्याला ऐकू जाईल का मी हाक मारली तर? येईल का तो आपल्या खिडकीबाहेरच्या उंच झाडावर?**''

आजी हसत म्हणाली, ''**किती प्रश्न विचारतेस? चांदोबाला एवढे प्रश्न विचारले तर चांदोबाची घरी जायची वेळ होईल आणि तुला उत्तर द्यायच्या आधीच सूर्यदादा येईल!**''

थोड्या वेळाने छबीला तिथे बागुलबुवा दिसतो.

छबी टुणकन उडी मारून बाकावरून खाली उतरते आणि म्हणते...



Audio story available on www.chikupiku.com/audio



**''बागुलबुवा, चांदोबा बघ नं किती छान दिसतोय.**
**तू जादू करून नेशील का मला चांदोबाला भेटायला?''**

बागुलबुवा म्हणतो, **''चालेल. उद्या रात्री जाऊयात**
**आपण. आता जाऊन मस्त झोप.''**

कशी-बशी रात्र संपते.
दुसऱ्या दिवशी छबी शाळेतून घरी येते. संध्याकाळ होते.
छबी चांदोबाची वाट पाहात खिडकीत उभी राहते.

हळू-हळू ढग बाजूला होऊन चांदोबा दिसायला लागतो. छबी जोरात उडी मारते आणि म्हणते...

**''आला रे आला चांदोबा.**
**चला रे चला त्याला भेटायला.''**

ठरल्याप्रमाणे बागुलबुवा आणि छबी बागेपाशी भेटतात. बागुलबुवा म्हणतो,

**''चिंग-चिंग चू चिंग-चिंग चू.**
**जादूच्या ढगा आम्हाला चांदोबाकडे घेऊन चल तू!''**

आणि काय गंम्मत, एक मऊ, गुबगुबीत ढग तिथे येतो.

बागुलबुवाचा हात धरून छबी ढगावर बसते. ढगावर बसून उडताना छबीला खूप मजा वाटते. आता चांदोबापण जवळ-जवळ यायला लागतो. एवढा मोठा चांदोबा बघून छबी म्हणते ...

**''चांदोबा... चांदोबा येऊ का घरात?**
**तुम्हाला भेटायला लांबून आलोय फार...''**

चांदोबा छोट्याश्या छबीला बघून खूप खुश होतो. चांदोबा म्हणतो, **''छबी कालच आपण गप्पा मारल्या आणि आज मला भेटायला पण आलीस तू. अरे वाऽऽऽ तुझ्या हातात काय आहे गं?''**

छबी म्हणाली, **''मी हे तुझ्यासाठी गिफ्ट आणलंय. आजीनं तयार केलेला मफलर. रात्री आकाशात तुला थंडी वाजत असेल ना म्हणून! तुला माहितीये, आजी मला रोज रात्री तुझं गाणं म्हणून दाखवते. आम्ही कोजागिरीला तुझ्यासाठी गोड-गोड मसाला दूधपण करतो.''**





Musical / Linguistic Intelligence

चांदोबा हसतो आणि म्हणतो,

**''छबी मला सुद्धा तुझ्यासारखी लहान मुलं खूप आवडतात. आणि हा मफलर सुद्धा खूप छान आहे. पण आता मला थोडावेळ सगळ्यांना प्रकाश द्यायचाय. त्याच चंद्रप्रकाशात तू घरी पोहोच नाहीतर खूप उशीर होईल. आपण रोज भेटूच तुझ्या खिडकीतून.''**



छबी आणि बागुलबुवा पुन्हा ढगावर बसतात आणि निघतात. जाता-जाता छबी आनंदाने गाणं गायला लागते...

**''आकाशातल्या चंद्रप्रकाशातून जाऊया...**
**आकाशात पोहणाऱ्या चांदण्यांशी शर्यत लावूया...**
**ढगावर बसून आकाशात फिरू...**
**रोज खिडकीतून चांदोबाला भेटू...''**

चांदोबाला भेटून परत आल्यावर छबी त्याचं एक छानसं चित्र काढून खिडकीवर लावून ठेवते.

**लेखन: वैदेही अष्टपुत्रे-कुलकर्णी**

**Parents Zone**

काल्पनिक गोष्टी मुलांना खूप आवडतात आणि एका वेगळ्या दुनियेत घेऊन जातात.

# छकुलीचे आजोबा

आजोबा लहानपणी असे का वागले,
दात नीट स्वच्छ का नाही घासले?,
सगळे दात एकदम पडले,
खोटे दात लावायला लागले,
वेळेवर कान साफ नाही केले,
म्हणून ऐकू येईनासे झाले,
भाज्या खाण्याचे का नाही ऐकले?,
म्हणूनच डोळ्यांना भिंगही लागले.

– जयश्री एडगावकर

आ.....
काय म्हणालीस,
छकुली...



Musical / Liguistic / Verbal Intelligence






**Follow these simple steps to draw a Duck.**



1



2



3



4



5

हे चित्र आम्हाला Whatsapp वर पाठवा.

91721 36478

Cubo was very excited as he was attending his uncle's wedding. There were so many delicious food items. Puri, Sabji, Gulabjamun, Papad, Wada, Chutney, and also yummy Ice Cream.






Cubo wanted to taste everything. Cubo's plate was full with all the food items.

Cubo, eat that puri & finish your plate.

Baba, My stomach is full. I can't eat this puri. What's the big deal if one puri is left over?

Cubo, do you know before this puri is served to you, it goes through so many stages?



The farmer sows seeds in the farm



The seeds grow into plants. The farmer waters the plants and protects it.



The plants grow into crops.



The farmer harvests the crops and the grains are separated.



Audio story available on www.chikupiku.com/audio



The grains are then sent to the big markets

From there, it goes to small shop keepers. We buy wheat grains from the shop keeper.





We clean them and send them to flour mills.

 **Logical Intelligence**










**Story by:**
**Prajaktta Kapure**

**Parents Zone**

At wedding programs or parties a large quantity of food gets leftover. There are some people/NGOs who collect this leftover food and give it to needy people. Along with children try to find out such NGOs.

# Nature and मी

Dharmaraj Patil
(Ornithologist / Wildlife Researcher)

## आपली त्वचा आणि इतर प्राण्यांची त्वचा सारखीच असते का?

तू माझा आवाज पावसाळ्यात ऐकलास का?
डराव... डराव...
तू जर कधी माझ्या अंगावरून हात फिरवलास तर तुला जाणवेल की माझी त्वचा ओलसर आहे. तुझ्या सारखी कोरडी आणि मऊ-मऊ नसते.

उन्हाळा मला फारसा आवडत नाही, उन्हामुळे माझी त्वचा कोरडी होते. तू जसं रात्र झाली की पांघरूण घेऊन झोपतोस, तसा मी उन्हाळा आला की जमिनीखाली जाऊन एकाजागी झोपून राहतो. तू पांघरूण घेतलं तरी नाकाने श्वास घेऊ शकतोस तसा मी जमिनीखाली असून त्वचेने श्वास घेतो. पूर्ण उन्हाळाभर आम्ही जमिनीखाली असतो. (यालाच उन्हाळी निद्रा / **aestivation** म्हणतात.)

पाऊस पडायला लागला की भरपूर किडे आणि कीटक खायला मिळतात. तेव्हा आम्ही पुन्हा जमिनीबाहेर येतो. भरपूर किडे खाऊन घेतो. हिवाळ्यात पुन्हा जमिनीखाली जाऊन झोपून जातो. (यालाच शीतनिद्रा / **hibernation** म्हणतात.)



तू तुझ्या हातावरून, पायावरून, गालावरून, कपाळावरून हात फिरवून बघ. कसं मऊ वाटतंय ना? माझ्या अंगावरून हात फिरवला तर अजिबात मऊ वाटत नाही. माझ्या अंगावर खवले आहेत ना! त्यामुळे माझी त्वचा खडबडीत आहे.

पण तुला माहिती आहे का? या अशा खडबडीत त्वचेचा मला खूप उपयोग होतो. कसा माहितीये? मी काही तुझ्यासारखा दोन पावलांवर चालत नाही. मी सरपटतो. त्यावेळी माझं अख्खं अंग जमिनीवर असतं. जमिनीवरून वेगाने सरपटताना या त्वचेचा मला उपयोग होतो. मी सरसर-सरसर सरपटतो!



अजून एक गंमत! तू तुझ्या अंगावरची त्वचा ओढून बघ. नाही निघत ना? पण माझी अख्खी त्वचा निघून जाते. माझी त्वचा जुनी होते तेव्हा मी ती पूर्णपणे काढून टाकू शकतो. तू जसं पायातला मोजा काढतोस अगदी तशीच मी ही जुनी त्वचा काढून टाकतो. यालाच कात टाकणे असेही म्हणतात. जुनी त्वचा काढून टाकल्यामुळे माझ्या शरीराची वाढ होते. माझ्या त्वचेमध्ये न दिसणारे परजीव (Parasite) सुध्दा निघून जातात.



Naturalistic Intelligence

## ओळख पाहू मी कोण?



आकाशात उडतो पण मी पक्षी नाही,
लांब शेपूट असते मला पण मी प्राणी नाही,
रंगबिरंगी असतो मी मुलांचा लाडका,
संक्रातीच्या सणात असतो माझाच गलका!

Intra-personal / Logical Intelligence

उत्तर: पतंग

In this monsoon season,
Mau wants to eat yummy corns.
Help her to get to the corns.







Visual / Spatial Intelligence


Smayan Kalpande

# My Corner

Smayan is fond of reading books and discussing people, animals, places, mythology and stories. Smayan wrote this story in 2016 when he was 6 years old.



## Robot & A Smart Girl

The Torch was a very small country. Once upon a time, there lived a cruel man in Torch. He sent a robot to the elementary school. The robot mixed poison in the swimming pool. Poor children! Where would they swim? The robot then took away all the numbers from the hopscotch design on the ground. Children were very sad. How could they play hopscotch? Then the robot did the worst thing. He took away the sky and mixed it with water in the swimming pool. What happened to the robot? Why is he behaving like this? We must destroy this evil guy. Teachers thought. Then a girl came to the elementary school. The girl said "Robot is neither bad nor good. He is only following instructions of someone who is a bad guy. The girl knew all the technology. She made changes in the settings of the robot. The robot stopped following the instructions of the cruel man. He started doing what the girl asked him to do. The robot first took away the sky from water and put it back where it was. He then placed the numbers on the hopscotch design. He took away poison from the swimming pool. The robot then went to the cruel man. The robot threw poison on the cruel man. It was an end of the cruel man. All the children and teachers were happy again.



